# पुण्यक्षेत्र चांगदेव महाराज समाधी स्थळ

डॉ. महेश सुभाष एडके



**पुण्यक्षेत्र चांगदेव महाराज समाधी स्थळ, पुणतांबे**

# डॉ. महेश सुभाष एडके
# ओटावा, कॅनडा.




पत्ता: महेश सुभाष एडके

ओटावा, ओन्तरिओ, कॅनडा

भ्रमणध्वनी: +१ ६१३ ८२५ ३९८५

ई पत्ता : maheshedake1@gmail.com

लेखक डॉ. महेश सुभाष एडके हे कार्बनी रसायन शास्त्रामध्ये एम. एस्सी, पी.एच.डी असून सध्या याच विषयामध्ये ओटावा, कॅनडा येथे संशोधन करत आहे. लेखकाचे मुळगाव नेवासे असून पुणतांबे येथे त्यांचे नातेवाईक राहतात. लेखक सध्या संतज्ञानेश्वर यांच्या आयुष्यावर संशोधनकरीत असून माउलींच्या जन्मगाव - आपेगाव तेआळंदी हा पूर्वीचा मार्ग शोधण्याचा प्रयत्न करत आहे. या दरम्यान लेखक विविध गावांना भेट देत २-३ दिवस त्या गावी राहून प्रवास वर्णनरूपी लिखाण करत आहे. यातून महाराष्ट्राला अनोळखी अश्या तीर्थक्षेत्र असणाऱ्या गावांची आणि इतिहासाची ओळख करून द्यायचा लेखकाचा प्रयत्न आहे.

समर्पण

माझे गुरु प्रो. श्रीनिवास सामंत, माटुंगा, मुंबई आणि ज्ञानेश्वर माउलींच्या चरणी अर्पण.

प्रकाशक ई साहित्य प्रतिष्ठान -:

www.esahity.com

esahity@gmail.com

प्रकाशन :- मार्च २०१७

पुणतांबे हे अहमदनगर जिल्हयातील, राहाता तालुक्यातील एक छोटे गाव, दक्षिण गंगा समजल्या जाणा-या गोदावरी नदीकाठी वसलेले आहे. या गावास धार्मिक, पौराणिक व ऐतिहासिक वारसा लाभलेला आहे. अनेक ऋषीमुनी, संत महंत या गावी तपश्चर्येसाठी वास्तव करून होते. पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकर यांचेही काही काळ येथे वास्तव्य होते. अशा या गावी भेट देऊन तेथील मंदिरातील पुजारी व गावातील वयस्क अनुभवी लोक यांच्याशी बातचीत केल्यानंतर ज्या काही गोष्टी वा इतिहास माझ्या लक्षात आला तो मी प्रस्तुत लेखाद्वारे मांडत आहे.

पुणतांबे गाव दौंड - मनमाड या रेल्वेमार्गावरील रेल्वे स्टेशन आहे. पुणे -दौंड मार्गे शिर्डीला जाणा-या रेल्वे पुणतांबे मार्गे जातात. रस्तामार्गे नाशिक व अहमदनगर पासून अंतर साधारण १०० कि.मी. आहे तसेच अहमदनगर - राहुरी - श्रीरामपूर व नाशिक - सिन्नर - शिर्डीफाटा मार्गे पुणतांब्यास रस्ता आहे.

या गावाच्या पश्चिमेकडून नदीचा प्रवाह दक्षिणोत्तर असा वाहण्यास सुरवात होते. ज्या ठिकाणी पूर्व - पश्चिम वाहिनी नदी दक्षिणोत्तर वाहते त्या स्थळास पुण्यक्षेत्र समजतात. गोदावरीचा असलेला दक्षिणोत्तर प्रवाह हा तिच्या प्रवासात केवळ पुणतांबे येथेच आढळतो. त्यामुळे या गावास धार्मिक दृष्टया विशेष महत्व प्राप्त झाले आहे. अहिल्याबाई होळकरांनी गोदावरी तीरी अनेक घाट बांधले असून तीरावरील मंदिराचा जीर्णोद्धार केलेला आहे. या गावात अनेक मंदिरे असून गावास मंदिराचे गाव असे म्हणतात. पुराणकाळी ''पुण्यस्तंभ'' व ''तांबीलिंदनापूर'' नावाने प्रसिद्ध असणारे गाव म्हणजेच सध्याचे ''पुणतांबे'' होय.

अगोदर उल्लेख केल्याप्रमाणे या गावात असणा-या अनेक पुरातन मंदिराबद्दल आपण जाणून घेऊया.

- पुणतांबे येथील पुरातन मंदिरे :

१) श्री चांगदेव महाराज समाधी मंदिर -

मध्ययुगातील संताच्या काळातील एक योगी संत व ज्यांच्यासाठी ज्ञानेश्वर महाराजांनी ''चांगदेव पासष्टी'' हा ग्रंथ लिहुन त्यांना उपदेश केला, अशा आदीशक्ती मुक्ताबाईचे शिष्य असलेले श्री चांगदेव महाराजांची संजीवन समाधी मंदिर गोदावरी नदीकाठी आहे.

२) सोमेश्वर मंदिर-

श्री चांगदेव महाराजांच्या समाधी मंदिरासमोर असलेले हे प्राचीन शिवमंदिर आहे, चांगदेवांना समाधी देण्यासाठी आलेले प्रत्यक्ष पांडुरंग, निवृत्ती महाराज, मुक्ताबाई, नामदेव

महाराज, गोरोबा काका इत्यादी संत याच मंदिरात वास्तव्यास होते असा श्रीनामदेव महाराजांच्या अभंगात उल्लेख आढळतो.

३) कार्तिक स्वामी मंदिर -

कार्तिक स्वामींच्या मोजक्याच असणा-या मंदिरापैकी एक असे हे हेमांड पंथी मंदिर आहे.

४) शनेश्वर मंदिर -

विक्रमादित्य कालीन पुरातन असे शनीदेवाचे मंदिर

५) यज्ञसेनी देवी मंदिर -

यज्ञामधुन प्रकट झालेली देवी ''याज्ञसेनीचे'' हे पुरातन मंदिर

६) काशी विश्वेश्वर मंदिर -

जनार्दश स्वामींनी जीर्णोद्धार केलेले हे शिवमंदिर, याशिवाय बाराज्योर्तिलिंग मंदिर, भैरवनाथ मंदिर, मामाभाचे मंदिर, प्रभुरामचंद्र मंदिर इत्यादी अनेक लहान मोठी, तसेच ज्ञात, अज्ञात मंदिरे गावामध्ये आपणांस पाहवयास मिळतात. गावांस १२ वेशी असून प्रत्येक वेशीजवळ मारूतीची स्थापना करून बांधलेली व सुस्थितीत असलेली १२ मारूतीची मंदिरे आहेत.

- श्रीचांगदेव महाराज समाधी मंदिर -

पुणतांबे गावापासून साधारण १ कि.मी. अंतरावर गोदावरी नदीच्या काठी निसर्गरम्य ठिकाणी हे प्राचीन पवित्र मंदिर आहे. प्राप्त माहितीनुसार सव्वाशे वर्षापूर्वी इंग्रज राजवटीत या ठिकाणी रेल्वे रूळाच्या बांधकामानंतर जी काही लाकडी सामुग्री उलेलेली होती तिचा उपयोग करून मंदिराच्या सभामंडपाचे बांधकाम पूर्ण झाले. मंदिरात प्रवेश केल्यावर समोरच विठ्ठल रूक्मिणी, ज्ञानेश्वर माऊली यांच्या मूर्तीचे दर्शन होते. परंतु आश्चर्याची गोष्ट म्हणजे चांगदेव महाराजांची मूर्ती व समाधी स्थळ मंदिराच्या मागच्या बाजूला आहे. या समाधीस्थळी समोर विस्तीर्ण असा गोदावरी नदीचा प्रवाह दिसतो. त्याचबरोबर या नदीवरील सव्वाशे वर्षापूर्वी ब्रिटीशांनी बांधलेला रेल्वेपूल दिसतो. हा गोदावरी नदीचा सुमारे १ कि.मी. प्रवाह आश्चर्यकारक रित्या बदलुन दक्षिणोत्तर झाला आहे.

समाधी मंदिर हे तीर्थक्षेत्र म्हणून प्रसिद्ध आहे. परंतु, सरकारी प्रयत्न कमी असल्याने इतर तीर्थक्षेत्राप्रमाणे याचा विकास झालेला नाही.

समाधी मंदिरासमोर एक पिंपळवृक्ष आढळतो, परंतु तो प्राचीन नसून, आळंदीक्षेत्री माऊलींच्या समाधी स्थळाजवळ असणा-या सुवर्ण पिंपळाप्रमाणे, चांगदेव समाधी पाशीही एक पिंपळ वृक्ष असावा म्हणून हा पिंपळ वृक्ष वाढवलेला आहे.

- मंदिरातील उत्सव/ यात्रा

१) आषाढ वद्य एकादशी -

श्री चांगदेव महाराज समाधीस्त होत असताना प्रत्यक्ष पांडुरंगाने वचन दिले की आषाढ वद्य एकादशीस दर्शन देण्यासाठी मी समाधीस्थळी येत जाईन. याच श्रद्धेपोटी आषाढी एकादशीस पंढरपूरला गेलेल्या दिंडया व वारकरी पैकी या परतीच्या मार्गावरील बहुतांशी सर्व दिंडया व वारकरी दशमीला समाधीस्थळी येतात व रात्रभर भजन, कीर्तनाचा कार्यक्रम करतात.

२) महाशिवरात्र -

माध वद्य त्रयोदशी शके १२१८ रोजी श्री चांगदेवांनी समाधी घेतली. याचे औचित्य साधून भाविक दर्शनसाठी येतात.

३) ऋषिपंचमी यात्रा -

भाद्रपद महिन्यात येणा-या पंचमीला गंगास्नानाचे विशेष महत्व असून ऋषिमुनीबद्दल आपली कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी हजारो भाविक समाधी दर्शनासाठी येतात. यामध्ये महिलांची संख्या लक्षणीय असल्याने ही प्रामुख्याने महिलांची यात्रा म्हणून ओळखली जाते.

- श्रीचांगदेव महाराज चरित्र -

चांगदेव महाराजांच्या समाधीमुळे पुणतांबे गावास विशेष महत्व असल्यामुळे चांगदेव महाराजांचे थोडक्यात चरित्र मांडणे उचित आहे. योगीराज चांगदेव महाराजांचा जन्मशक उपलब्ध नाही. मुक्ताबाईचा अनुग्रह झाला त्यावेळी चांगदेव १४०० वर्षाचे होते तर मुक्ताबाई १४ वर्षाची याचा संदर्भ पकडला तर चांगदेवांचा जन्म शालिवाहन शकाच्या २०० वर्षे अगोदर झाला असावा असे लक्षात येते. खानदेशात ज्या एदलाबादला (मुक्ताईनगर) मुक्ताईने समाधी घेतली त्या एदलाबाद जवळच तापी पूर्णा (पयोष्णा) नदयांच्या संगमावर ''चांगदेव'' नावाचे गाव आहे. यालाच पूर्वी सुंदरपूर म्हणत असत. याव गावी चांगदेवांचा जन्म झाला असे मानले जाते.

चांगदेवांच्या जन्माबाबत ग्रंथात असा उल्लेख आढळतो की इंद्राच्या दरबारात असलेल्या ५० गणांपैकी मरूद्‌गणाकडून (ज्याचा वा-यावर ताबा आहे असा) अजाणतेपणी इंद्राचा अपमान झाला. त्यामुळे इंद्राच्या शापामुळे भूलोकी जन्म घ्यावा लागला. तेव्हा मरूद्‌गणाने इंद्राकडे क्षमयाचना केली तेव्हा इंद्राने त्याला उ:शाप दिला की ब्रह्मा, विष्णू, महेश व आदिमाया भूतलावर अवतार धारण करतील, त्यांच्याकडून तुझा उद्धार होईल व तेव्हा तू इंद्र दरबारी परत येशील. पुदे मरूद्‌गणाने चांगदेव रूपाने व देवतांनी ज्ञानेश्वरादी भावंडाच्या रूपाने भूतलावर अवतार घेतला. चांगदेव महाराजांनी आपल्या जीवनकाळात कठोर साधना करून, व्रतस्थ राहून योगाचा पूर्ण अभ्यास केला व अपूर्व योग सामर्थ्य प्राप्त करून घेतले. चार वेद, उपवेद, शास्त्रे, उपशास्त्रे यांचा अभ्यास केला. १८ पुराणे शिकून घेतली. १४ विद्या, ६४ कला अवगत करून घेतल्या. मृत मानवास संजीवनी देण्याचे सामर्थ्य त्यांच्यात होते. आपल्या अपूर्व अशा योगसामर्थ्याने त्यांनी काळावरही विजय मिळवून १४०० वर्षाचे प्रदिर्घ आयुष्य प्राप्त करून घेतले. असे असले तरी त्यांना आत्मज्ञान झालेले नव्हते. परिणामी माझ्या एवढा श्रेष्ठ व अधिकारी योगी दुसरा नाही असा गर्व त्यांना झाला होता, तसेच त्यांचा शिष्यपरिवारही फार मोठा होता.

चांगदेव महाराजांनी तापी पूर्णा संगमावर मठ स्थापन केलेला होता. येथेच ते समाधी लावून बसत. प्रत्येक शंभर वर्षांनी काळ न्यायला आला की समाधी लावून प्राण ब्रह्मांडात नेऊन ठेवत. सहा-सहा महिने समाधी लावून बसत. त्यामुळे काळ येऊन परत जात असे व समाधी उतरली की लगेच चांगदेव स्वत:चे नाव बदलत असत. ती नावे अशी (१) चांगदेव चांगा (२) वटेश्वर चांगा (३) चक्रपाणी चांगा (४) सिद्ध चांगा (५) शिवयोगी चांगा (६) मणिसिद्ध चांगा (७) अनकट चांगा (८) नाहमा चांगा (९) नागेश चांगा (१०) मुधेश चांगा (११) सत्वसिद्ध चांगा (१२) निश्चळदास चांगा (१३) चिंधादेवी चांगा (१४) बुटी चांगा.

चांगदेव महाराज योगसामर्थ्य मिळवल्यानंतर भ्रमंती करत, चमत्कार करत, शिष्य संप्रदाय वाढवत होते.

ज्ञानेश्वरादी संत, भावंडे आळंदीकडे जाताना नेवास्याहून चांगदेवाच्या गावाला पुणतांब्याला आली. तेथेच चांगदेव समाधीतून उठल्यावर माणसे जिवंत करायचे. तोवर लोक प्रेते जतन करून ठेवत. तेथे पोहचल्यावर मुक्ताबाईने विचारले ''ही प्रेते लिंबाच्या पाल्यात का ठेवली आहेत?'' त्यावर लोक म्हणाले ''चांगदेव महाराज समाधीतून उठले की यांचे अवलोकन करून एखाद्यास जिवंत करतात'' त्यावर मुक्ताबाईने शेजारी पडलेले एक कुत्रयाचे हाड उचलून त्या प्रेतांवरून ओवाळून फेकून दिले. त्यावर सर्व प्रेते जिवंत तर झालीच पण ते कुत्रेही जिवंत झाले. या कथेस निळोबारायांच्या अभंगात प्रमाण आढळतो.

॥ निळा म्हणे जिही प्रेते जीवविली।

वरदे उपजविली स्त्रिया बाळे ॥

चांगदेव महाराजांनी ज्ञानेश्वरादी भावंडांची किर्ती ऐकली. त्यांचा उत्कर्ष व किर्ती सहन न होऊन त्यांनी ज्ञानेश्वरांना अपमानित करून मीच श्रेष्ठ आहे हे दाखवण्यासाठी पत्र लिहून भेट देण्याचे ठरवले. परंतु ज्ञानेश्वरांना चिरंजीव संबोधावे तर त्यांच्या नावलौकीकास ते शोभणारे नव्हते. तीर्थस्वरूप लिहावे तर आपल्या नावलौकीकास शोभणारे नव्हते, शिवाय ज्ञानेश्वर तर वयानेही लहान, या संभ्रमात पडून अखेर त्यांनी शिष्याकरवी तोंडीच नमस्कार सांगून कोरा कागदच पत्र म्हणून ज्ञानेश्वरांकडे पाठवला.

या ठिकाणी कोरा कागद पत्र म्हणून पाठवण्यामागे एक गहन अर्थ असाही आहे की, चांगदेवांनी विचार केला मी १४०० वर्षे शरीर सांभाळून ठेवलेले आहे ते फक्त याची वाट बघत की केव्हा ब्रह्मा, विष्णु, महेश व आदिमाया भूतलावर अवतार घेतात. कारण त्यांच्या द्वारे माझी मुक्ती होणार आहे. जर खरंच ज्ञानेश्वरादी भावंडे देवांचे अवतार असतील, तर या को-या कागदाच्या पत्राद्वारे सुद्धा ते माझा भाव समजतील व मला अध्यात्मिक उपदेश करतील. हा गुप्त हेतू चांगदेवांचा होता, त्यामुळेच अक्षररूपी सुक्ष्म पत्र सामान्यजनांना दिसत नव्हते. जसा परमात्मा लपलेला असतो तसंच ते पत्रही लपलेल होतं.

ज्ञानेश्वरांनी जाणले की चांगदेव कोरा आहे, शुद्ध आहे, ज्ञान ग्रहण करण्यास योग्य आहे. मग ज्ञानेश्वर महाराजांनी चांगदेव चौसष्ट (६४) कला शिकले होते म्हणून पुढची कला म्हणजेच 'आत्मज्ञान' ६५ ओव्यांच्या रूपाने त्यांना सांगीतले.

॥ कला पासष्टावी उकलूनी दाविली ॥

ज्याचा अर्थ केला असता ब्रह्मज्ञान होईल अशी 'पासष्टी' ज्ञानेश्वरांनी त्या कागदावर लिहीली.

॥ स्वस्तिश्री वटेशु। जो लपोनी जगदा भासु।

दावी मग ग्रासु। प्रगटला करी ॥

यज्ञ न करता, अध्ययन, अध्यापन न करता, काही एक साधना न करता आत्मप्राप्ती केवळ पासष्टी वाचल्याने होईल असे पत्रात सांगितले. असा पासष्ट ओव्यांचा अप्रतिम व अलौकिक अध्यात्मीक उपदेश करणारे ते पत्र चांगदेवांकडे पाठवले, तेच पुढे 'चांगदेव पासष्टी' म्हणून प्रसिद्ध झाले.

चांगदेवांनी त्या पत्राची पूजा करून वाचून पाहिले परंतु आपणास याचा अर्थ कळत नाही, आपली कीहीही युक्ती चालत नाही हे चांगदेवांनी जाणले. ज्यांची कीर्ती कानाने ऐकली त्यांना डोळयाने पाहावे असा निश्चय केला. त्यांना भेटल्याशिवाय यमयातना चुकणार नाहीत, काळाला

कुठवर फसवणार ? मग सर्व शिष्यांना जाण्याची तयारी करण्यास सांगितले त्यावर सर्व शिष्य सांगु लागले की आपण वैभवासहित चालावे.

वैभवाला दिपुन निवृत्ती, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई आपल्याला शरण येतील. ज्ञानेश्वरांकडून पासष्ट ओव्यांच्या प्रसाद मिळाल्यावर सुद्धा त्यांचा अहंकार उतरला नव्हता. भक्तांच्या सांगण्यावरून चांगदेवांनी सर्व शक्ती निशी ज्ञानेश्वर महाराजांना भेटण्यास जाण्याचे ठरवले. हातात सर्पाचा चाबुक घेऊन, वाघावर बसुन सर्व शिष्यांसह ते ज्ञानेश्वर भेटीस निघाले त्यावेळी सर्व भावंडे अलंकापुरीत (आळंदी) एका भिंतीवर बसलेली होती. त्यावेळी चांगदेवांस सामोरे जाण्यासाठी, निवृत्ती नाथाच्या सांगण्यावरून ज्ञानेश्वरांनी भिंत चालवली. ते पाहून चांगदेवाचा अहंकार उतरला. तेव्हा चांगदेवांस एकात्म ज्ञान देण्यास ज्ञानोबांनी मुक्ताबाईस सांगितले येथे आपणास १४०० वर्षाचा शिष्य व १४ वर्षाची गुरू पाहण्यास मिळतात.

चांगदेव महाराजांच्या नावे संस्कृत भाषेतील 'तत्वसार' (१०३६ ओव्या) व 'योगेंद्राचितामणी' तसेच मराठी भाषेतील 'उत्तरपंचविशी' हे ग्रंथ ज्ञात आहेत. त्याचप्रमाणे त्यांचे ५० अभंग मिळतात. एक योगी म्हणून त्यांची योग्यता फार मोठी होती. तथापी जनसामान्यासाठी त्यांनी भक्तिमार्गच सांगितला हे विशेष.

- समाधी -

ज्ञानेश्वरांनी आळंदी येथे समाधी घेतल्यानंतर सर्व संत सासवड गावी गेले. तेथे मार्गशीर्ष वद्य १३ शके १२१८ या दिवशी सोपान काकांनी समाधी घेतली. सासवड जागाच का निवडली गेली यामागे कारण असे आहे की ब्रह्मदेवाने पूर्वी येथे तपश्चर्या केली होती. सोपानदेव हे त्यांचे अवतार असे मानले जाते. त्यानंतर सर्व संत प्रवास करत करत पांडुरंगासमवेत गोदातीरी आले.

पाहिला कचेश्वर पाहिली ती गोदा । आली प्रतीपदा माघमास् ।
नामा म्हणे देवा जाणे पुण्यस्तंभा । मनोहर जागा सिद्धेश्वर ॥

असा पुणतांब्याचा उल्लेख नामदेवांनी केलेला आहे. पुणतांब्यास आल्यावर

। नेमा आता स्थळ समाधीसी ।

असा निश्चय चांगदेवांनी केला. माघ वद्य १० शके १२१८ या दिवशी सर्वजण पुणतांब्यास आले व सोमेश्वराच्या मंदिरात थांबले. एकादशीला किर्तनाची गर्दी झाली, द्वादशीला पारणे झाली. त्रयोदशी उजाडली व निवृत्ती, मुक्ताई, नामदेव, चोखामेळा, परिसा भागवत इत्यादी अनेक संतासहीत पांडुरंग गहिवरले. 'मुक्ताबाईने चांगदेव घेतलासी पोटा' असा गुरूचा आर्शिवाद घेऊन चांगदेव समाधी विवरात उतरले. अशा रीतीने माघ वद्य १३ शके १२१८, महाशिवरात्र या पावन दिनी चांगदेव समाधीस्त झाले. त्यांच्या समाधिच्या वेळीच

॥ गेले योगीराज राहिले ठायी ठायी ।आता मुक्ताई जाईल की ॥

असे भविष्य वर्तवण्यात आले. आधी शिष्याची नंतर गुरूची समाधी असे चांगदेव - मुक्ताई आणि ज्ञानेश्वर - निवृत्ती यांच्याबाबत अलौकिक घडले.

त्यानंतर इ.स. १६ व्या शतकात नारायणडोह ता.जि. अहमदनगर येथील रूक्मिणी व मुधोपंत मरुद्गण (कुलकर्णी) या ब्राह्मण दांपत्यास अनेक वर्षांनी पुत्र झाला. त्यास चांगदेवांचा पुनर्जन्म समजण्यात येते. त्याचे नावही चांगदेव ठेवण्यात आले. पंढरपुरी त्यांनी विठ्ठलाची आराधना केली. विठ्ठलाने त्यांना अनुग्रह केला व पुजेसाठी एक 'केशवराजाची' मुर्ती दिली. ते मुर्ती घेऊन पुणतांब्यास आले व तेथेच कायम राहिले.

हे एक सिद्धपुरूष होते, त्यांनी अनेक चमत्कार केलेले होते, बिदरच्या बादशहाच्या सर्पदंशाने मृत झालेल्या पत्नीस त्यांनी जिवंत केले होते. त्यामुळे त्यांच्या सांगण्यावरून बादशहाने पंढरपूरचे विठ्ठल मंदिर बांधून दिले, अशी कथा सांगण्यात येते. सध्या पुजारी असणारे मरुद्गण हे त्यांचे १९ व्या पिढीचे वंशज असावेत.

अशा या प्राचीन निसर्गरम्य तसेच पवित्र ठिकाणाहुन पाऊल निघत नव्हते. परंतु वेळे अभावी चांगदेव महाराजांच्या समाधीला नमस्कार करून तेथील पवित्रस्थळे, निसर्गरम्य गोदावरी नदीचे पात्र नजरेत कैद करून मी परतीच्या प्रवासाला निघालो ते एकाच उमेदीवर, एकाच आशेवर की भविष्यात मला परत या ठिकाणी भेट दयायची आहे व ती एका महान योग्याच्या समाधीजवळ शांतपणे दिवस घालवण्यासाठी, ते फक्त मन:शांतीसाठी.

## ई साहित्य प्रतिष्ठान

आता मराठी ई पुस्तकं तुम्ही www. esahity. com वरून डाऊनलोड करा.

किंवाesahity@gmail. com ला कळवून मेलने मिळवा.

किंवा7710980841हा नंबर सेव्ह करून या नंबरला तुमचे नांव व गांवWhatsapp करून पुस्तके whatsapp मार्गे मिळवा.

किंवा ई साहित्यचे app. https://play. google. com/store/apps/details?id=com. esahity. www. esahitybooks या लिंकवर उपलब्ध आहे. ते download करा.

हे सर्व मोफ़त आहे.

आता ठरवलंय. मराठी पुस्तकांनी अवघं विश्व व्यापून टाकू. प्रत्येक मराठी सुशिक्षिताच्या मोबाईल मध्ये किमान पन्नास मराठी पुस्तकं असलीच पाहिजेत. प्रत्येक मराठी माणसाच्या! तुमची साथ असेल तर सहज शक्य आहे हे... कृपया जास्तीत जास्त लोकांना यात सामिल करून घ्या.

आपले नम्र

टीम ई साहित्य

